**छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेअंतर्गत ग्राम विकास विभागाच्या अखत्यारीतील आपले सरकार सेवा केंद्रामार्फत भरलेल्या शेतकऱ्यांच्या कर्जमाफी ऑनलाईन अर्जाचे सेवाशुल्क अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण ०४१९/प्र.क्र.५९/२-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २८ जानेवारी, २०२०

वाचा :-

१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक कृकमा ०६१७ / प्र.क्र.१२७/२-स दि. २८.६.२०१७, दि. ८.९.२०१७, दि.७.१२.२०१७, दि.२८.२.२०१८, दि.३१.३.२०१८, दि.१६.४.२०१८ व दि.२.५.२०१८

२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन शुद्धीपत्र क्रमांक कृकमा ०६१७ / प्र.क्र.१२७/ २-स दि. ५.७.२०१७, दि.२०.७.२०१७ व दि.१२.१२.२०१७

३) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्रमांक कृकमा ०४१८ / प्र.क्र.५३/२-स दि. ९.५.२०१८ व दि.५.६.२०१८

४) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन परिपत्रक क्रमांक कृकमा ०४१८ / प्र.क्र.५३/ २-स दि. २१.५.२०१८

५) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन परिपत्रक क्रमांक कृकमा ०७१८ / प्र.क्र.११८/ २-स दि.१०.८.२०१८

६) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग शासन निर्णय क्र. अर्थसं ०३१८/प्र.क्र.७५/२-स दि. ४.५.२०१८ व दि. २.६.२०१८

प्रस्तावना:-

राज्यामध्ये सन २००९-१० पासून असलेल्या सततच्या दुष्काळ व नापिकीमुळे कर्जबाजारी झालेल्या शेतक-यांना दिलासा देण्यासाठी दि.२४.६.२०१७ च्या मंत्रीमंडळ बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार शासन निर्णय दि. २८.६.२०१७ अन्वये "छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना-२०१७" घोषित करण्यात आलेली आहे. तद्नंतर सदर योजनेचा अधिकाधिक शेतकऱ्यांना लाभ मिळावा या दृष्टीने,वरील "वाचा-" येथे नमूद केलेल्या अ.क्र.१ ते ५ येथील सहकार विभागाच्या शासन निर्णय व शुद्धीपत्रकान्वये वेळोवेळी या योजनेत बदल करण्यात आला आहे.

छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेअंतर्गत आपले सरकार सेवा केंद्रामार्फत शेतकऱ्यांच्या कर्जमाफीचे अर्ज भरण्यासाठीचे सेवा शुल्क प्रती अर्ज रु. १० प्रमाणे शासनामार्फत अदा करण्याचा निर्णय दि. २३.०८.२०१७ च्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत घेण्यात आला. त्यानुसार दि. ०८/०९/२०१७ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेअंतर्गत ग्राम विकास विभागाच्या अखत्यारीतील आपले सरकार सेवा केंद्रामार्फत भरलेल्या शेतकऱ्यांच्या कर्जमाफी ऑनलाईन अर्जाचे सेवाशुल्क अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजनेअंतर्गत आपले सरकार सेवा केंद्रामार्फत भरलेल्या शेतकऱ्यांच्या कर्जमाफीच्या अर्जांची माहिती ग्रामविकास विभागाकडून दि.१७.१.२०२० च्या पत्रान्वये प्राप्त झाली आहे.

ग्रामविकास विभागाच्या अखत्यारीतील आपले सरकार सेवा केंद्रामार्फत शेतकऱ्यांच्या कर्जमाफी अर्जाच्या एकूण ९,०३,४४२ नोंदी केल्याचे ग्राम विकास विभागाने कळविले आहे. तसेच दि.२८.१.२०२० च्या पत्रान्वये सी.एस.सी.- एस.पी.व्ही. ई गव्हर्नन्स सर्विसेस इंडिया लिमिटेड या कंपनीच्या खालील बँक खात्यात सेवाशुल्काची रक्कम परस्पर अदा करण्याबाबत कळविले आहे.

कंपनीचे नाव - CSC E GOVERNANCE SER INDIA LTD

खाते क्रमांक - 604820110000150

आयएफएससी कोड - BKID0006048

शाखा - CGO COMPLEX BRANCH DELHI-11003

दि. ८.०९.२०१७ च्या शासन निर्णयानुसार सदर अर्जाच्या नोंदींचे एकूण सेवाशुल्क (९,०३,४४२ X १०) रु. ९०,३४,४२०/-एवढे होते. सदर आपले सरकार सेवा केंद्रांच्या सेवाशुल्काची रक्कम रु.९०,३४,४२०/- (रुपये नव्वद लाख चौतीस हजार चारशे वीस फक्त) “CSC E GOVERNANCE SER INDIA LTD” या कंपनीला अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू रक्कम मागणी क्रमांक व्ही- २, २४३५-- इतर कृषिविषयक कार्यक्रम, ००, ६० - इतर, १०१ -- शेतक-यांच्या कर्ज माफीसाठी योजना, छत्रपती शिवाजी महाराज शेतकरी सन्मान योजना- २०१७ (राज्य स्तर) (२४३५ ००८२)-२८- व्यावसायिक सेवा (दत्तमत) या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० या वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून खर्च करण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२.१.२०२० अन्वये विभागास अधिकार प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत निर्गमित करण्यात येत आहे, या परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१५०७५५२३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ramesh Shankarrao Shingte

Digitally signed by Ramesh Shankarrao Shingte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperation, Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fed1b2ed6e1e4aca719170d9eae8aa251ee28dc56c75d8a65acb34103d45bd48, serialNumber=b9bf7a534d8f1272bd902482bf95b556a5baefdddce18574a78fa2d8d0957d1f, cn=Ramesh Shankarrao Shingte
Date: 2020.01.28 15:10:23 +05'30'

**( रमेश शिंगटे )**
अवर सचिव तथा सहनिबंधक,
सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखाकार, महाराष्ट्र- १, मुंबई.
३. महालेखाकार, महाराष्ट्र- २, नागपूर.
४. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था. (सर्व)

५. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था. (सर्व)

६. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प -१३, मंत्रालय, मुंबई

७. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

८. ग्रामविकास विभाग, आसंक कक्ष, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई

९. कोषागार अधिकारी, पुणे.

१०. अवर सचिव (कार्यासन १७ स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई

११. निवड नस्ती-२-स.